**प्रशासकीय मान्यता**

सर ज.जी.समूह रुग्णालय,मुंबई अंतर्गत ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई येथील लेडीज हॉस्टेल्स, डॉक्टर्स क्वाटर्सचे नुतनीकरण व अद्यावतीकरण करण्यासाठी

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : जीसीएम-२०१८/प्र.क्र.२४२/प्रशा-१
गो.ते.रुग्णालय आवार,नविन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १९ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :** संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं/जजीरु/ लेडीजहॉस्टेलवडॉक्टर्सक्वार्टर/८४०६/प(आय)/७०३२, दि. २९.६.२०१८

**शासन निर्णय :**

सर ज.जी.समूह रुग्णालय, मुंबई अंतर्गत ग्रँट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई येथील डॉक्टर्स क्वार्टर बिल्डींग नं.५, ओल्ड लेडीज हॉस्टेल्स बिल्डींग, अपना लेडीज हॉस्टेल बिल्डींग येथील विविध दुरुस्त्या व नुतनीकरणांची खालील तक्त्यात दर्शविलेल्या प्रमाणे कामे करण्यासाठी एकूण रुपये ७,०१,६०,९०२/- (रुपये सात कोटी एक लक्ष साठ हजार नऊशे दोन फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | कामाचे स्वरुप | संचालनालयाने प्रस्तावित केलेली रक्कम रुपये | छाननीअंती मान्य केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | Repairs to Doctor's Quarter Building No.5 at J.J. Hospital Mumbai (Structural Repairs to RCC Column and Beams External Plaster Water Proofing sanitary works flooring doors & windows, kitchen platform etc.) | ३,७८,४९,००० | ३,७८,४९,००० |
| २ | Renovation of door windows kitchen Platform, toilet block flooring, plastering, painting & external plaster & painting to old Ladies Hostel building at J.J. Hospital | २,१४,२४,७३० | २,१४,२४,७३० |

| अ. क्र. | कामाचे स्वरुप | संचालनालयाने प्रस्तावित केलेली रक्कम रुपये | छाननीअंती मान्य केलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| | Compound Mumbai | | |
| ३ | Renovation to Room Passage and Staircase of Apna Ladies Hostel building at J.J. Hospital Compound Mumbai | १,०८,८७,१७२ | १,०८,८७, १७२ |
| | **एकूण** | **७,०१,६०,९०२** | **७,०१,६०,९०२** |

**अटी व शर्ती :-**

१. उपरोक्त तक्यामध्ये दर्शविलेल्या ३ कामांची एकच निविदा काढण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
४. कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अभियंता/अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
५. कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.
६. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.: इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
७. संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ७.२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

**२.** सदर कामासाठी निधीची तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करु नये. निधीची तरतूद झाल्यानंतर सदर काम हे खाली नमूद केलेल्या लेखाशीषाअंतर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. हा शासन निर्णय ,वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५७/इमा-३, दिनांक २१.०९.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक २०१८१११९१५१९३२५०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.11.19 15:26:31 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई.
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३) अधिष्ठाता, ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज.जी.समूह रुग्णालय, भायखळा, मुंबई.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई (३) मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (सार्वजनिक बांधकाम) विभाग, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) निवडनस्ती (प्रशा-१).